जलसंपदा विभागाच्या प्रकल्पातून स्थानिक स्वराज्य संस्थांच्या म्हणजेच महानगरपालिका, जिल्हापरिषदा, नगरपरिषदा, नगरपालिका, नगरपंचायती, ग्रामपंचायती आणि कटक मंडळे (Cantonment Board) यांच्या नळ पाणी पुरवठा योजनांबाबतच्या प्रस्तावास मान्यता देण्याचे अधिकार मंत्रीमंडळाऐवजी विभागास देण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

### शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१३/(४६०/१३)/सिं.व्य(धोरण)

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

तारीख: २८/८/२०१४

वाचा —

**शासन निर्णय क्रमांकः** - जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १००१/ (१५४/०१/ ) सिंव्य(धोरण) दिनांक २१ जानेवारी २००३

प्रस्तावना —

१. शासनाच्या सन २०११ पूर्वीच्या धोरणानुसार, पिण्याच्या पाण्यासहित सर्व प्रकारच्या बिगरसिंचन प्रयोजनासाठी उदा. उद्योग, औष्णिक विद्युत प्रकल्प, अन्य सिंचनेतर संस्था इ., यांना पाणी आरक्षण द्यावयाचे जे प्रस्ताव जलसंपदा विभागाकडे प्राप्त होत होते, त्यातील पाण्याचे आरक्षण हे जलसंपदा विभागाच्या प्रकल्पांच्या जलाशयातील उपलब्ध पाणीसाठयाच्या १५ टक्क्यांपेक्षा कमी असल्यास, त्यास संबंधित मुख्य अभियंताकडून मान्यता देण्यात येत होती, तसेच हे प्रमाण १५ ते २५ टक्के असे असल्यास, त्यास मंत्रालयीन आंतर विभागीय सचिवस्तरीय समितीकडून मान्यता देण्यात येत होती. त्याचप्रमाणे हे प्रमाण २५ टक्क्यांपेक्षा जास्त असल्यास, त्यास मा. मंत्रीमंडळाची उपसमिती असलेल्या, मा. मंत्री, जलसंपदा (कृखोपाम वगळून) यांच्या अध्यक्षतेखालील मा. मंत्री उच्चाधिकार समितीकडून मान्यता देण्यात येत होती.

२. महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण (सुधारणा व पुढे चालू ठेवणे) अधिनियम, २०११ यातील कलम ५ मधील १६ (क) नुसार जलसंपत्ती प्रकल्पांमधील पाण्याचे क्षेत्रिय वाटप राज्य मंत्रीमंडळाकडून केले जाईल अशी तरतूद दि. २२/४/२०११ पासून करण्यात आली आहे. त्यानुसार

परिचछेद १ मध्ये नमूद सर्व पाणी आरक्षण प्रस्तावांना मा. मंत्रीमंडळाची मान्यता घेवून नंतर शासन निर्णय निर्गमित करण्यात येतो.

३. दि. २२/४/२०११ रोजी म.ज.नि.प्रा. (सुधारणा पुढे चालू ठेवणे) अधिनियम २०११ प्रसिध्द झाल्यानंतर विभागाकडे बिगर सिंचन पाणी आरक्षण मंजुरीचे प्रस्ताव सादर होण्याचे प्रमाण अतिशय जास्त असून प्रत्येक प्रकरणी मा.मंत्रीमंडळ स्तरापर्यंत सादर करुन मान्यता घेताना फार मोठा कालावधी लागतो व त्यामुळे, विशेष करुन पिण्याच्या पाण्याकरीता जलसंपदा विभागाच्या जलाशयातून स्थानिक स्वराज्य संस्थांच्या म्हणजेच महानगरपालिका, जिल्हापरिषदा, नगरपरिषदा, नगरपालिका ग्रामपंचायती, नगरपंचायती आणि कटक मंडळे (Cantonment Board) यांच्या नळ पाणी पुरवठा योजनेबाबतच्या प्रस्तावांना मान्यता देण्याचे मंत्रीमंडळाकडील अधिकार विभागाकडे वर्ग करण्यात यावे जेणेकरून असे प्रस्ताव मंजूरीसाठी मंत्रीमंडळाकडे सादर करण्याची आवश्यकता राहणार नाही व अशा प्रस्तावांना मा. मंत्री, जलसंपदा विभाग यांच्या स्तरावरूनच मान्यता देण्यात यावी याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

त्यानुसार दि.२०/८/२०१४ रोजी झालेल्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय—

४. महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण (सुधारणा व पुढे चालू ठेवणे) अधिनयम, २०११ यातील कलम ५ मधील १६ (क) नुसार जलसंपत्ती प्रकल्पांमधील पाण्याचे क्षेत्रिय वाटप राज्य मंत्रीमंडळाकडून केले जाईल अशी तरतूद दि. २२/४/२०११ पासून करण्यात आली आहे.

५. उपरोक्त तरतूदीनुसार जलसंपदा विभागाच्या प्रकल्पातून जिल्हापरिषदा, नगरपरिषदा, नगरपालिका, नगरपंचायती, ग्रामपंचायती, आणि कटक मंडळे (Cantonment Board) यांनी पिण्यासाठी पाणी मागणी केलेल्या नळ पाणी पुरवठा योजनाबाबतचे बिगर सिंचन पाणी आरक्षण प्रस्ताव मा.मंत्री मंडळासमोर मान्यतेस्तव सादर करण्याऐवजी त्यास मा. मंत्री, जलसंपदा यांच्या स्तरावरूनच मान्यता देण्यात यावी. तथापि, महानगरपालिका, विशेष नगर विकास प्रकल्प (Special Township Project) व औद्योगिक प्रयोजनासाठी बिगर सिंचन पाणी आरक्षणाच्या प्रस्तावांना मंत्रिमंडळाची मान्यता आवश्यक राहिल.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३२५/२०१४/व्यय-१२, दिनांक १२/८/२०१४ अनुसार प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२८१७३५३६४१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Kisan Sonawane

Digitally signed by Shrikant Kisan Sonawane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shrikant Kisan Sonawane
Date: 2014.08.30 17:24:31 +05'30'

**(श्री.कि.सोनावणे)**

शासनाचे कक्ष अधिकारी

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव.
४. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
५. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
६. मा. विराधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. मा. विराधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
८. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
११. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१३. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

१४. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.

१५ मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

१६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७. सर्व मंत्रालयीन विभाग.

१८. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९. प्रधान सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२०. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१. सर्व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२२. सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२३. सर्व अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२४. सर्व कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२७ सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.

२८. सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग.

२९ सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.

३०. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.

३१. निवडनस्ती कार्यासन सिंव्यधोरण.

--------------------------